**बदली रद्द करणेबाबत**

उप अभियंता (स्थापत्य)

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१७/प्र.क्र.४२ /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ८.३.२०१७

वाचा : शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१७/प्र.क्र.६ /सेवा-२, दिनांक ०७.०१.२०१७

## शासन आदेश

श्री. लियाकत अकबर काझी, उप अभियंता, जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) यांची बदली उक्त दिनांक ७.१.२०१७ च्या शासन आदेशान्वये जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) येथून सा.बां. उप विभाग, जामखेड या ठिकाणी करण्यात आली आहे. सदर आदेश या शासन आदेशान्वये, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव रद्द करण्यात येत आहेत. श्री. लियाकत अकबर काझी, उप अभियंता (स्थापत्य) हे जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) या ठिकाणी कार्यरत राहतील.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, श्री. लियाकत अकबर काझी, उप अभियंता (स्थापत्य) यांना जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार त्यांच्या रजेचा अर्ज स्वीकारु नये/ मंजूर करु नये.

३. श्री. काझी यांनी जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, कोपरगांव-२ (अहमदनगर) या पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव त्यांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी हे आदेश रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०८१३०६०३०५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.03.08 13:08:13 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक
३. जिल्हा कोषागार अधिकारी अहमदनगर
४. श्री. लियाकत अकबर काझी, उप अभियंता, यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांच्या मार्फत.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री (सा.बां.), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (रस्ते / बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
७. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.